**सहकार विभागाच्या प्रशासकीय अधिपत्याखालील कार्यालयातील गट-क व ड संवर्गात सरळसेवा प्रवेशाने नेमणुका करताना अपंगाचे ३% आरक्षण लागू करण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक राजस १४१०/प्र.क्र.२५४/१२-स,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ जानेवारी, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, समक्रमांक दिनांक ७-७-२००८
२) सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे पत्र क्रमांकः आस्था/कक्ष-५/अपंग पद निश्चिती / ११, दि.१२.०१.२०११

**प्रस्तावनाः-**

अपंग व्यक्ती (समान संधी, संपुर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ च्या नियम ३२ नुसार अपंगांसाठी पदे शोधुन अधिनियमाच्या नियम ३३ नुसार शासनाने सहकार सेवेतील गट-क व ड संवर्गात सरळसेवेने व पदोन्नतीने होणा-या नेमणुकांसाठी अंध/अल्पदृष्टी/कर्णबधीर/अस्थीव्यंग प्रवर्गासाठी प्रत्येकी एक व एकूण ३% असे आरक्षण शासन निर्णय क्र. सहक १४०३/प्र.क्र.२१५/१२-स, दि.७.७.२००८ च्या शासन निर्णयानुसार विहित केलेले आहे.

श्रीमती निलिमा अनंत सुर्वे यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेली रिट याचिका क्र. ३२९४/२०१० व श्री.हर्षद जाधव यांनी दाखल जनहित याचिका क्र.२२५/२००९ मध्ये मा. उच्च न्यायालयाने अपंगांसाठीसुयोग्य पदनिश्चितीच्या शासन निर्णयाचे पुनर्विलोकन करुन सुधारित शासननिर्णय निर्गमित करण्याचे सूचित केले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या सुचनेच्या अनुषंगाने प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग यांचे अध्यक्षतेखाली दिनांक ५.१.२०११ रोजी झालेल्या बैठकीत अपंग व्यक्तींच्या आरक्षणाबाबतचा सामाजिक न्याय विभागाचे शासन निर्णय, दि.०३.०८.२०१० व दि.१३.०८.२००९ मधील विहीत केलेल्या सूचनानुसार सुधारित आदेश विभागाने निर्गमित करण्याचे निदेश आहेत. दि.०३.०८.२०१० च्या शासन निर्णयातील सूचनानुसार केंद्र शासनाने अपंगांच्या पद निश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादीनुसार राज्य शासनाच्या अखत्यारितील शासकीय व निमशासकीय आस्थापनेवरील जी पदे समान आहेत, ती पदे संबंधित मंत्रालयीन विभागांनी अपंगासाठी निश्चित करुन तसेच आदेश निर्गमित करावे. त्या अनुषंगाने अपंग आरक्षणाबाबतचा उक्त दि. ७.७.०८ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.त्यानुसार शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

अपंग अधिनियम, १९९५ च्यानियम ३२ व ३३ नुसार सहकार विभागाच्या गट-क व ड संवर्गातील पदांवर सरळसेवेने प्रवेशाकरिता व पदोन्नतीने नेमणुका करण्यासाठी अपंगांकरिता आरक्षणा संदर्भात निर्गमित करण्यात आलेला दिनांक ०७.०७.०८ चा शासन निर्णय या आदेशाद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

पदाची कर्तव्ये व जबाबदारी लक्षात घेऊन ज्या आस्थापनाच्या बाबतीत वरील प्रमाणे ३% आरक्षण ठेवणे शक्य नाही. अशा बाबतीत या तरतुदीतुन सुट देण्याबाबत अधिनियमातील कलम ३३ मध्ये तरतुद आहे. या अधिनियमाच्या कलम ३६ च्या परंतुकानुसार अपंगाच्या प्रवर्गामधील आरक्षण दुस-या प्रवर्गामध्ये हस्तांतरणीय आहे. केंद्र शासनाच्या अपंग व्यक्ती (समान संधी, संपुर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ अधिनियमातील तरतुदीच्या अनुषंगाने सा.प्र.वि. परिपत्रक क्रमांक

एसआरव्ही-१०९८/प्र.क्र.१२/१६-अ, दिनांक २ मे, १९९८ व सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. एसआरव्ही १०९९/प्र.क्र.३७/९९/१६-अ दिनांक ५ मार्च, २००२, व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचा शासन निर्णय क्रमांक न्यायाप्र-२००९/प्र.क्र.९/(भाग-१)/सुधार-३, दि.१३.०८.२००९ व शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/सुधार-३, दि.०३.०८.२०१० अन्वये शासन सेवेतील पदावर अपंगासाठी आरक्षण ठेवण्याबाबतची कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे.

विभागाने यापूर्वी निर्गमित करण्यात आलेला उक्त निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून आता अपंग अधिनियमात अपंगांना शासन सेवेत संपूर्ण सहभाग व समानसंधी देण्याचे अभिप्रेत असल्याने अपंग पात्रतेच्या सुधारित निकषानुसार सहकार विभागाच्या प्रशासकीय अधिपत्याखालील गट-क व ड च्या विविध पदांसाठी सरळसेवेने व पदोन्नतीने नेमणुका करताना शारिरिकदृष्टया अपंगांसाठी सोबतच्या निकषानुसार ३% आरक्षण पदनिहाय लागू करण्यात येत आहे.

सदरचे आदेश सामाजिक न्याय विभागाचे अ.शा.पत्र क्रमांकःन्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/ सुधार-३, दि.०७.०१.२०११ च्या पत्रान्वये दिलेल्या सूचनेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( स्ने.स.गांवकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

सोबत : परिशिष्ट अ,ब व क

प्रति,

१) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) संचालक, हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर
७) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (प्रशासन / लेखा परिक्षण)
८) सर्व जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था,
९) सर्व जिल्हा विशेष लेखा परिक्षक, सहकारी संस्था
१०) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४) मा. राज्यपालांचे खाजगी सचिव,राजभवन, मुंबई
१५) विशेष कार्य अधिकारी/सर्व उप सचिव/सर्व अवर सचिव/सर्व कार्यासन अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
१६) खाजगी सचिव (मा. मुख्यमंत्री/मा.उप मुख्यमंत्री/मा.मंत्री (सहकार)/मा.मंत्री (पणन)/मा.मंत्री (वस्त्रोद्योग)/मा.राज्यमंत्री (सहकार)/मा.राज्यमंत्री (पणन)/मा.राज्यमंत्री (वस्त्रोद्योग)
१७) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) /सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहाय्यक
१८) निवड नस्ती.

**परिशिष्ट - अ**

**शासन निर्णय क्रमांक सहक १४१०/प्र.क्र.२५४/१२-स**
**दिनांक १४ जानेवारी, २०११ सोबतच्या**
**सहकार सेवेतील गट-क व गट-ड मधील पदांच्या नियुक्तीकरिता अपंग व्यक्तीसाठी शारीरिक पात्रतेचे निकष**

| अ.क्र. | पद | | अंधव्यक्ती | कर्णबधीर | अस्थीव्यंग |
|---|---|---|---|---|---|
| १. | अ) गट-क<br>ब) गट-ड | }<br>}<br>}<br>}<br>}<br>} | दृष्टीक्षीणता अपंग अधिनियम १९९५ चे कलम २ (यु) मध्ये विहित केलेली | अपंग अधिनियम १९९५ कलम २ (j ) मध्ये विहित केलेली | (अपंगात्वाचे किमान प्रमाण ४०% असणे आवश्यक आहे.) |

## परिशिष्ट-ब

**शासन निर्णय क्रमांक सहक १४१०/प्र.क्र.२५४/१२-स दिनांक १४ जानेवारी,२०११**

**सोबतच्या विवरणपत्रातील संक्षिप्त नोंदीचे पुर्ण स्वरुप**

| | | |
|---|---|---|
| BLA | - | Both Legs and Arms affected |
| BA | - | Both Arms affected |
| OL | - | One Leg affected |
| BL | - | Both Legs affected |
| OA | - | One Arm affected |
| OAL | - | One Arm and One Leg affected |
| B | - | Blind |
| LV | - | Low vision |
| HH | - | Hearing Hadicapped |

## परिशिष्ट - क

**शासन निर्णय क्रमांक सहक १४१०/प्र.क्र.२५४/१२-स, दिनाक १४ जानेवारी,२०११**
**सोबतचे अपंगाना ३% आरक्षण लागू करणेबाबतचे पदनिहाय विवरणपत्र**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | **प्रशासन कक्ष** | | |
| **अ. क्र.** | **पदनाम** | **अंध/अल्पदृष्टी (दृष्टीक्षीणता) १%** | **कर्णबधिर १%** | **अस्थीव्यग १%** |
| १ | उच्च श्रेणी लघुलेखक | B.LV | अपात्र | OL,OA,BL, OAL. |
| २ | निम्न श्रेणी लघुलेखक | B.LV | HH | OL,OA,BL, OAL. |
| ३ | कार्यालय अधिक्षक | B.LV | HH | OL,OA,BL, OAL. |
| ४ | मुख्य लिपिक | B.LV | HH | OL,OA,BL, OAL. |
| ५ | लेखापाल | अपात्र | HH | OL,OA,BL, OAL. |
| ६ | वरिष्ठ लिपिक | B.LV | HH | OL,OA,BL, OAL. |
| ७ | शिरस्तेदार | B.LV | अपात्र | OL,OA,BL, OAL. |
| ८ | कनिष्ठ लिपीक | B.LV | HH | OL,OA,BL, OAL. |
| ९ | प्रतवारीकार | LV | HH | OL,OA,BL. |
| | | **वर्ग-४** | | |
| १ | दप्तरबंद | अपात्र | HH | OA. |
| २ | नाईक | B.LV | HH | OL. |
| ३ | रोनिओ ऑपरेटर | LV | HH | अपात्र |
| ४ | झेरॉक्स ऑपरेटर | अपात्र | HH | OL,BL. |
| ५ | शिपाई | B.LV | HH | OL. |
| ६ | पहारेकरी | अपात्र | HH | OL,BL. |